**ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या दरडोई खर्चाच्या सुधारित निकषाच्या १०० टक्केहून अधिक दरडोई खर्च असणाऱ्या योजनांना मान्यता देण्यासाठी उच्चाधिकार समिती स्थापन करण्याबाबत**

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१६७/पापु-०७

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ०१ ऑगस्ट, २०१४

**वाचा :**

**१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३.**

### प्रस्तावना :

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ११ सप्टेंबर, २०१३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार दरडोई खर्चाचे सुधारित निकष लागू करण्यास संदर्भाधीन दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. मा.मंत्रीमंडळाच्या निर्देशानुसार दरडोई खर्चाच्या सुधारित निकषांच्या १०० टक्क्यांहून अधिक दरडोई खर्च असणाऱ्या योजनांना मान्यता देण्यासाठी मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांच्या अध्यक्षतेखाली अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव (नियोजन विभाग), अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव (वित्त विभाग) व प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचा समावेश असणारी उच्चाधिकार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय :

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी संदर्भाधीन दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या दरडोई खर्चाच्या सुधारित निकषांच्या १०० टक्क्यांहून अधिक दरडोई खर्च असणाऱ्या योजनांच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्यासाठी खालील प्रमाणे उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात येत आहे

**उच्चाधिकार समिती**

| अ.क्र. | पदनाम | विभाग | समिती |
|---|---|---|---|
| १ | मा.मंत्री | पाणी पुरवठा व स्वच्छता | अध्यक्ष |
| २ | अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव | नियोजन विभाग | सदस्य |
| ३ | अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव | वित्त विभाग | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ५ | मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य सचिव |

मा.मंत्रीमंडळाच्या निर्णयानुसार दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी निश्चित करण्यात आलेल्या दरडोई खर्चाच्या १०० टक्क्यांपेक्षा जास्त खर्चाच्या योजनांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा निर्णय या समितीद्वारे घेण्यात येईल.

मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी यांनी शासनाकडे प्रशासकीय मान्यतेसाठी प्राप्त झालेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रस्तावांची छाननी करावी. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी यांनी उच्चाधिकार समितीच्या अध्यक्षांकडून बैठकीसाठी दिनांक व वेळ प्राप्त करून घ्यावी व त्याप्रमाणे बैठकांचे आयोजन करावे.

उच्चाधिकार समितीमध्ये झालेल्या निर्णयानुसार कार्यवाही करणे, बैठकांचे इतिवृत्त तयार करणे, बैठकीतील निर्णयानुसार मंजूर झालेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्याची जबाबदारी उच्चाधिकार समितीचे सदस्य सचिव म्हणून मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांची राहील. उच्चाधिकार समितीच्या सर्व आदेशांचे पालन करणे सदस्य सचिव यांना बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०११३२३५२२३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Gitte

Digitally signed by Kiran Gitte
DN: CN = Kiran Gitte, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2014.08.01 17:45:04 +05'30'

**किरण गित्ते**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
२. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
४. मा.मंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
५. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
६. मा.राज्यमंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
७. मा.विधानसभा/ विधानपरिषद सदस्य (सर्व)
८. विभागीय आयुक्त (सर्व)
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

१०. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
११. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व)
१३. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१४. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१५. प्रादेशिक उपसंचालक (सर्व), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा.
१६. मुख्याधिकारी, नगरपरिषदा (सर्व)
१७. अधीक्षक अभियंता (सर्व)
१८. कार्यकारी अभियंता (सर्व)
१९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
२०. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
२१. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
२२. गटविकास अधिकारी, पंचायत समित्या (सर्व)
२३. मंत्रालयीन सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये.
२४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
२५. निवडनस्ती (कार्यासन, पापु-०७)